सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत (माहे जुलै, २०२०).

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-१३२०/प्र.क्र. ५४ /उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑगस्ट, २०२०

<u>वाचा</u> : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र. क्र. ६४/अर्थ-३, दि. १६/०४/२०२०.
२) शासन निर्णय समक्रमांक दि.१४ मे, २०२० व दि.२ जुलै, २०२० .
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे क्र. कार्यासन-९, रानिवि/१४७, दि.९ जुलै, २०२० चे पत्र.

**<u>प्रस्तावना:-</u>**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकास अनुसरून या विभागाच्या अर्थसंकल्प शाखेने मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (२८५१ ०५८५) या लेखाशिर्षाखाली २५ टक्केच्या मर्यादेत ३६ सहायक अनुदान (वेतन) व ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या उपलेखाशिर्षांखाली अनुक्रमे रुपये ११,६२,६८,४००/- व रुपये ६०,९००/- इतके अनुदान वितरीत केलेले आहे. या तरतूदीमधून मंडळाचा माहे मे व जून, २०२० या महिन्याचा वेतन, सेवानिवृत्ती वेतन इ. तसेच वेतनेतर खर्च भागविण्यासाठी अनुक्रमे रूपये ११,६२,६६,०००/- व रुपये ६०,९००/ इतके अनुदान संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेले आहे.

२. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाने त्यांच्या संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये माहे जुलै ते सप्टेंबर, २०२० या तीन महिन्यांचा वेतन, सेवानिवृत्ती वेतन यावरील खर्च भागविण्यासाठी रुपये १७,४३,९९,०००/- व ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) साठी रुपये ६९,००,०००/- इतके अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली आहे.

३. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचा माहे जुलै, २०२० या एक महिन्याचा वेतन, सेवानिवृत्ती वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

खादी व ग्रामोद्योग मंडळास माहे जुलै, २०२० या एक महिन्याचा वेतन, सेवानिवृत्ती वेतन, अंशदानावरील खर्च भागविण्यासाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रुपये ५,८१,३३,०००/- (पाच कोटी एक्याऐंशी लाख तेहतीस हजार मात्र) इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टाखालील सन २०२०-२१ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३० / २०१३/ विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८-भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००८१८१४२९४०३५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kavita Vijay Pawar

Digitally signed by Kavita Vijay Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a3b87786359abd7b3f135e9849f2f0e3f2ca97e8ca2dd67ad836635a3aa0ea9, serialNumber=6f8674619c7f615d9eeac52c9289956e27601f17938f0e253b14bde8e35e822e, cn=Kavita Vijay Pawar
Date: 2020.08.18 14:40:48 +05'30'

**( कविता पवार )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

**माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित .**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-३,१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुं-३२
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).